प्रवरा कालवा उपविभागांची पुनर्रचना करुन लोणी ता.राहाता येथे अस्तित्वातील लघु पाटबंधारे सर्व्हेक्षण उपविभाग, लोणी यांचे रुपांतर सिंचन व्यवस्थापन उपविभागात करणेबाबत.

## महाराष्ट्र शासन

## जलसंपदा विभाग

शासन निर्णय क्रमांकः आस्था-२०१३/(प्र.क्र.८८/२०१३)/सिं.व्य.(महसूल),

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक: २ ऑगस्ट, २०१४

**वाचा :-**

मुख्य अभियंता जलसंपदा विभाग, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, नाशिक यांचे क्रमांक उमप्र/आ-२/२८५७/२०१३, दिनांक १४.०५.२०१३ व क्रमांक उमप्र/आ-२/४३२५/२०१४ दि. १६.०७.२०१४ ची पत्र.

**प्रस्तावना :-**

भंडारदरा प्रकल्पाचा डाव्या कालव्याचे व्यवस्थापन २ उपविभागांमार्फत करण्यात येते. प्रवरा उजवा व डावा कालवा मिळून एकूण १० शाखा कार्यालय प्रवरा डाव्या कालव्यावर कार्यरत असून सोनगाव हे एकमेव शाखा कार्यालय उजव्या कालव्यावर कार्यरत आहे. यासाठी संगमनेर व श्रीरामपूर येथे प्रत्येकी एक उप विभागीय कार्यालय आहे. संगमनेर येथील उपविभागीय कार्यालय शेतक-यांच्या गैरसोयीचे असल्यामुळे वडाळा पाटबंधारे उप विभागाची पुनर्रचना करुन लोणी, तालुका राहाता येथील अस्तिवातील लघु पाटबंधारे सर्वेक्षण उपविभागाचे रुपांतर सिंचन व्यवस्थापन उपविभागात करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय:-**

गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांच्या अधिपत्याखालील मुख्य अभियंता, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, नाशिक यांच्या अधिनस्त अहमदनगर पाटबंधारे विभाग, अहमदनगर अंतर्गत प्रवरा कालवा उपविभांगाची पुर्नरचना करुन अस्तित्वातील लघु पाटबंधारे सर्वेक्षण उपविभाग, लोणी, श्रीरामपूर याचे लोणी सिंचन व्यवस्थापन उपविभागात रुपांतरण करुन त्यांचेकडे आश्वी १,आश्वी २,लोणी क्र.१, लोणी क्र. २ व खंडाळा या पाच सिंचन शाखा जोडून देण्यास खालील अटींच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१. या मंजूरीमुळे सुधारित आकृतिबंधानुसार सद्यस्थितीत कोणतीही नवीन पदे निर्माण करण्यात येणार नाहीत.
२. लघु पाटबंधारे सर्वेक्षण उपविभाग, लोणी उपविभागाचे सिंचन व्यवस्थापन कार्यप्रकारात रुपांतरण करण्याचा प्रस्ताव असल्यामुळे प्रशासकीय आस्थापना खर्चात वाढ होणार नाही व शासनावर कोणताही आर्थिक भार डणार नाही, सदर विभागात उपलब्ध असलेल्या आस्थापनेमार्फतच सिंचन व्यवस्थापनाची कामे करण्यात यावीत.

३. प्रवरा डावा कालवा सिंचन व्यवस्थापन उपविभाग, लोणी यांचे कार्यालय जुन्या शासकीय जागेतच ठेवावे, त्यासाठी बांधकामाचा वेगळयाने खर्च करु नये.

४. सध्या कार्यरत उपविभागातील उपलब्ध साहित्याचाच वापर करण्यात यावा.

२. प्रवरा डावा कालवा सिंचन व्यवस्थापन उपविभाग लोणी, ता. राहाता हे कार्यालय आदेश निर्गमित झाल्यापासून कार्यान्वित होईल याद्दष्टीने कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांनी आवश्यक ती कार्यवाही करावी.

३. या उपविभागावर होणारा खर्च मागणी क्र.आय-३, २७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे (योजनेतर) ८० सर्वसाधारण, ००१ संचालन व प्रशासन, ०४ व्यवस्थापन आस्थापना, (०४)(१५) अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नाशिक (२७०१ ए ०२१) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. लघु पाटबंधारे सर्वेक्षण उपविभाग याचे रुपांतरण प्रवरा डावा कालवा सिंचन व्यवस्थापन उपविभाग लोणी या सिंचन व्यवस्थापन कार्यप्रकारात केल्यामुळे कार्यालयाच्या वर्गीकरणानंतर आस्थापनेवर होणा-या खर्चाच्या लेखाशीर्षात बदल होत नाही. तथापि, सर्वेक्षण उपविभागाचे सिंचन व्यवस्थापन उपविभागात रुपांतर केल्याने कार्यप्रकारात बदल संभवतो, सदर बाब विधानमंडळाच्या निदर्शनास आणण्यात यावी.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१४०८०२१३२९२४२३२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Yashavantrao Kashinath Bhadane

Digitally signed by Yashavantrao Kashinath Bhadane
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Yashavantrao Kashinath Bhadane
Date: 2014.08.02 13:28:10 +05'30'

( य. का. भदाणे )

शासनाचे अवर सचिव

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव,

२. मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय,
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे कार्यालय,
४. मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई
५. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई
६. मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई
७. मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई
८. मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
९. मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१०. मा. राज्यमंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
११. प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. प्रधान सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई
१४. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर
१५. सर्व कार्यकारी संचालक, पाटबंधारे विकास महामंडळ, जलसंपदा विभाग
१६. मुख्य अभियंता(पा) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग
१८. सह सचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१९. आंतरवित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
२०. उप सचिव, (सिंव्य), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
२१. अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नाशिक
२२. कार्यकारी अभियंता, अहमदनगर पाटबंधारे विभाग, अहमदनगर
२३. कोषागार अधिकारी, अहमदनगर कोषागार, अहमदनगर
२४. माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
२५. ग्रंथालय, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
२६. जलसंपदा विभागातील सर्व कार्यासने, मंत्रालय, मुंबई
२७. सिंव्य(महसूल), कार्यासन संग्रहार्थ.